**जलसंपदा प्रकल्पातून श्री.शिक्षण प्रतिष्ठाण सोलापूर तर्फे सचिव अमोल अरुण जोशी, मौजे-संभवे, ता.मुळशी,जि.पुणे या प्रस्तावित शैक्षणिक संकुलासाठी पिण्यासाठीच्या बिगर सिंचन पाणी आरक्षणाच्या प्रस्तावास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग**

**शासन निर्णय क्रमांक. बिसिंआ २०१६/(६१२/१६)/सिंव्य (धो)**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०००३२.

दिनांक : १०/३/२०१७

**<u>संदर्भ:</u>** १) जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्रमांक संकीर्ण १००१/ (१५४/०१)/सिंव्य(धोरण) दि. २१ जानेवारी २००३.

२) महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण अधिनियम, २००५ यात सुधारणा करण्याकरिता अधिनियम दि.२२ एप्रिल,२०११.

३) शासन निर्णय क्र. संकिर्ण २०१३/(४६०/१३)/सिंव्य (धोरण), दि. २८/८/२०१४

४) शासन निर्णय क्र. संकिर्ण २०१३/(४१५/१३)/सिंव्य (धोरण), दि. १६/८/२०१४

५) मुख्य अभियंता (जसं), जलसंपदा विभाग, पुणे यांचे जा.क्र.मुअ (जसं)/(३८१/१६)/ प्रशा-८/(५११२), दि. २३/११/२०१६

६) शासन निर्णय क्र. संकिर्ण २०१५/(४४/१५)/सिंव्य (धोरण), दि. १७/११/२०१६

**प्रस्तावना :-**

१.० महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण (सुधारणा व पुढे चालू ठेवणे) अधिनियम, २०११ यातील कलम ५ मधील १६(क) नुसार जलसंपत्ती प्रकल्पांमधील पाण्याचे क्षेत्रीय वाटप राज्य मंत्रीमंडळाकडून केले जाईल अशी तरतूद करण्यात आली आहे. परंतु दि. २८.८.२०१४ रोजी च्या शासन निर्णयान्वये जलसंपदा विभागाच्या प्रकल्पातून जिल्हापरिषदा, नगरपंचायती, नगरपालिका, नगरपरिषदा, ग्रामपंचायती, आणि कटक मंडळे (Cantonment Board) यांनी पिण्यासाठी पाणी मागणी केलेल्या नळ पाणी पुरवठा योजनांबाबतचे बिगर सिंचन पाणी आरक्षण प्रस्ताव मा.मंत्रीमंडळा समोर मान्यतेस्तव सादर करण्याऐवजी त्यास मा.मंत्री, जलसंपदा विभाग यांच्या स्तरावरुनच मान्यता देण्यात यावी.असा निर्णय झाला होता. आता संदर्भिय पत्र क्र. ६ नुसार परिच्छेद २.२

नुसार परि.१ मध्ये निर्धारित केलेल्या क्षेत्रिय वाटपापेक्षा जादा होणारे वैयक्तिक, ग्रामपंचायती, नगरपालिका, नगरपंचायती,जिल्हा परिषदा, कटकमंडळे, सहकारी गृहनिर्माण संस्था व शिक्षण संस्थांच्या पिण्याच्या पाण्याचे आणि सुक्ष्म व लघु उद्योगांचे औद्योगीक पाणी वापराचे प्रस्तावांना शासन स्तरावरुन मा.मंत्री, (जलसंपदा) यांच्या मंजूरीने मान्यता द्यावी, असा निर्णय झालेला आहे. या अनुषंगाने संदर्भ क्र. ५ नुसार प्राप्त झालेल्या खालील प्रस्तावास मंजुरी देण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय**

२.० खालील तक्त्यातील रकाना क्र.२ मध्ये नमुद संस्थांना त्यांचे नावासमोर रकाना क्र.५ मध्ये नमूद पाणी आरक्षणास, परिच्छेद ३.० मधील अटींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पाणी आरक्षणाची मागणी करणाऱ्या संस्थेचे नांव | पाणी वापराचा प्रकार ( घरगुती) | मंजूर केलेले पाणी आरक्षण (दलघमी) | जलाशय/कालवा नदीचे नांव | या पाणी आरक्षणामुळे होणार सिंचन कपात (हेक्टर) |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | | ४ | ५ |
| १ | श्री.शिक्षण प्रतिष्ठाण सोलापूर तर्फे सचिव अमोल अरुण जोशी, मौजे-संभवे, ता.मुळशी,जि.पुणे | घरगुती | ०.००९८१ | मुळा नदी मुळशी प्रकल्प | १.४४ |

३.० उपरोक्त नमूद प्रस्तावास खालील अटींच्या अधीन राहून मान्यता देण्यात आली आहे.

१. संस्थेने वरील अ.क्र.६ नसार सिंचन कपातीपोटी,सिंचन पुन:स्थापनेचा खर्च रु. १ लक्ष प्रतिहेक्टर प्रमाणे (Base Year २००९ ) अधिक भाववाढ निर्देशांक (Cost Inflation Index ) विचारात घेवून येणारी रक्कम अथवा प्रत्यक्ष करारनामा करतेवेळी लागु असलेला शासनाचा प्रचलित दर यापैकी जो जास्त असेल त्या दराने सिंचन पुन:र्स्थापना खर्च शासनाकडे करारनामा करण्यापूर्वी जमा करण्यात यावा. पाणी आरक्षणापोटी प्राप्त होणाऱ्या रकमा हया शासनाच्या एकत्रीत निधीमध्ये जमा करणे आवश्यक राहील. या पाणी आरक्षणामुळे सिंचन कपाती पोटी प्राप्त झालेली सिंचन पुन:स्थापना खर्चाची रककम ही त्याच प्रकल्पाचे सिंचन क्षेत्र पुन:स्थापित करण्याबाबतच्या योजनेकरीता वापरण्यात यावी.

२. संस्थेकडून शासनाच्या प्रचलित घरगुती दराने दोन महिन्यांच्या पाणीपट्टी इतकी रक्कम सुरक्षा ठेव म्हणून घेण्यात यावी व होणाऱ्या पाणी वापराच्याअनुषंगाने नियमितपणे पाणीपट्टी वसूल करण्यात यावी.

३. संस्थेने पाणी मोजमाप करण्याचे दृष्टीने जलमापन यंत्र (Water Meter) पाणी वापर सुरु करण्यापूर्वी बसवावे. जर संस्थेने जलमापन यंत्र बसविले नाही, तर संस्थेचा पाणीपुरवठा सुरु करण्यात येवू नये.

४. आपत्कालीन परिस्थितीत तसेच दुष्काळग्रस्त परिस्थितीत पाण्या अभावी संस्थेस पाण्याची गरज भागविण्याकरिता कमीतकमी ६० दिवस पाणी पुरेल इतक्या क्षमतेचा साठवण तलाव स्वखर्चाने बांधावा. उद्भव ठिकाणी पाण्याची कमतरता असल्यास संस्थेने आरक्षित केलेल्या पाण्याची शाश्वती देता येणार नाही व यासाठी जलसंपदा विभागाची कोणतीही जबाबदारी राहणार नाही. तुटीच्या पर्जन्यमानाच्या वर्षात उपलब्ध असलेल्या कमी साठयातून पूर्वीच्या आरक्षणाच्या पाणी कोटयात कपात करण्याचे अधिकार संबंधीत कार्यकारी अभियंता यांना राहतील.

५. ज्या बिगर सिंचन पाणी वापरकर्त्या ग्राहकाकडे ६ महिन्या पेक्षा जास्त कालावधीचे पाणीपट्टी थकित राहिल त्या ग्राहकाचे पाणी वापर बंद करण्यात यावे व दंडासहित पाणी आकारणी भरुन घेवून त्यास पाणी पुरवठा सुरु करावा. ज्या ग्राहकाकडे १ वर्षा पेक्षा जास्त कालावधीचे पाणीपट्टी थकित राहिल अशा ग्राहकाचे मुख्य अभियंता स्तरावर आढावा घेवून पाणी आरक्षण रद्द करावे.

६. सांडपाण्यामुळे जलस्त्रोताचे अथवा नद्यांचे प्रदुषण होणार नाही याची संबंधित संस्थांनी दक्षता घ्यावी.

७. जलस्त्रोत प्रदुषित करणाऱ्या पाणी वापरकर्त्याकडून दंडनीय पाणीपट्टी आकारणी करणेबाबत मार्गदर्शक तत्वे या विषयाबाबत शासन निर्णय क्र. पापव २०१५/(प्र.क्र. ८८/२०१५)/सिंव्य (महसूल) दि. २१/४/२०१६ मधील अटींचे पालन करणे पाणी वापरकर्त्यांना बंधनकारक राहील.

८. संस्थेने सांडपाण्यावर शुध्दीकरण प्रक्रिया करणारी यंत्रणा बसवून जास्तीत जास्त पाण्याचा पुर्नवापर करावा. तसेच याबाबतच्या सविस्तर प्रस्तावाची माहिती जलसंपदा/पर्यावरण विभागास विहित कालावधीत म्हणजेच करारनामा करतेवेळी देण्यात यावी.

९. संस्थेस प्रथम पाणी वापर करण्यास परवानगीचे इरादापत्र (लेटर ऑफ इंटेन्ट) देण्यात यावे व करारनामा करण्याकरीता ३ वर्षाची मुदत ठेवावी. करारनामा झाल्यानंतरच प्रत्यक्ष पाणी परवाना दिल्याचे ग्राहय मानण्यात येईल. सदर करारनामा इरादापत्र दिल्याच्या दिनांकापासुन १ वर्षात करण्यात आला तर त्यासाठी सुरक्षा ठेव व्यतिरिक्त कोणतेही शुल्क आकारण्यात येणार नाही. तथापि, जर इरादापत्र दिल्याच्या दिनांकापासुन १ वर्षात करारनामा केला नाही तर दुसऱ्या वर्षी करारनामा करताना मागील १ वर्षाचा

बांधिलकी /लेखबध्द आकार (Commitment Charges) लावून करारनामा करावा. मात्र २ वर्षानंतर करारनामा करावयाचा झाल्यास त्यास शासनाची मंजूरी पुनःश्च घेणे व मागील २ वर्षाचा बांधिलकी /लेखबध्द आकार (Commitment Charges) लावून करारनामा करणे बंधनकारक राहिल. करारनामा करण्याची कमाल मर्यादा ३ वर्षाची राहिल. ३ वर्षाच्या कालावधीत करारनामा न केल्यास पाणी आरक्षण आपोआप रद्द होईल. त्याप्रकारचे आदेश संबंधित क्षेत्रिय मुख्य अभियंता यांनी काढावेत.

१०. महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण, मुंबई यांनी महाराष्ट्र राज्यासाठी ठोक पाणी प्रशुल्क निकष भाग ३ मधील परिच्छेद १३.४ (पाच) मध्ये नमूद केल्यानुसार जलसंपदा विभागाशी करारनामा करताना बिगरसिंचन पाणीपारकर्ते अंतिम पाणी मागणी प्रमाणे टप्प्याटप्प्याने पाणीवापर करण्याचे नियोजन नमूद करु शकतील. अंतिम पाणी मागणी प्रमाणे पुरवठा सुरु होईपर्यंत वर्षनिहाय खालीलप्रमाणे आकारणी करण्यात येईल.

अ) टप्प्यानुसार ठरवून घेतलेल्या प्रमाणात पाणीवापर असल्यास लागू दराने आकारणी करावी.

ब) टप्प्यानुसार ठरवून घेतलेल्या पाणीवापरापेक्षा ± १० पाणीवापर (अधिक/कमी) झाल्यास, फरकाच्या वापरास दंडनीय दर लागू दराच्या १.५ पट राहतील.

क) उर्वरित प्रमाणाकरिता म्हणजे अंतिम नियोजित पाणीवापर वजा टप्प्यानुसार नियोजित पाणी वापराकरिता, बांधिलकी / लेखबध्द आकार लागू दराच्या ५ टक्के वार्षिक प्रमाणे आकारण्यात येईल.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०१७०३१४१६४७४५९४२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Namita Gaurav Baser

Digitally signed by Namita Gaurav Baser
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8ee2809da7de03ff444cfa186d623a75fac5db94fb5c9de45f8a05b5f4b6fb7f, cn=Namita Gaurav Baser
Date: 2017.03.29 11:58:29 +05'30'

**( न. गौ. बसेर )**
**शासनाच्या अवर सचिव**

**प्रति,**

१. मा. राज्यपालांचे सचिव.

२. मा. मुख्यमंत्र्यांचे सचिव.

३. मा. अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई.

४. मा. सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई.

५. मा. विराधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई.

६. मा. विराधी पक्षनेते, विधानपरिषद, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई.

७. सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव.

८. सर्व मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.

९. सचिव, महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण, मुंबई.

१० मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.

११. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

१२. प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

१३. सचिव (जसंव्य व लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

१४. मुख्य अभियंता (पा) व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

१५. सर्व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

१६. सर्व उपसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

१७. मुख्य अभियंता (जसं), जलसंपदा विभाग, पुणे.

१८ अधिक्षक अभियंता,पुणे पाटबंधारे मंडळ,पुणे

१९. निवडनस्ती कार्यासन सिंव्य (धोरण)